**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या भारत सरकार मॅट्रीकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीकरीता जारी केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना राज्यात लागू करण्याबाबत. (केंद्र हिस्सा निधी वितरण पध्दती)**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंपुयो २०२३/प्र.क्र.१९/शिक्षण-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २३ जून, २०२३

वाचा :-

१. सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, भारत सरकार यांनी दिनांक ०५.०५.२०२२ रोजी निर्गमित केलेल्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनाकरीताच्या सुधारीत मार्गदर्शक सूचना.

**प्रस्तावना :-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील मुला-मुलींनी शिक्षणाची संधी उपलब्ध व्हावी, शाळा महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या गळतीचे प्रमाण कमी व्हावे, गुणवत मुला मुलींना उच्च शिक्षणाकरिता संधी प्राप्त व्हावी यांकरिता इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत भारत सरकार मॅट्रिकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना राबविण्यात येतात.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापर्यंत भारत सरकार मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्तीकरिता केंद्र व राज्य हिस्सा यांचे प्रमाण ५०:५० असे होते व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्तीकरिता केंद्र हिस्सा १००% होता.

सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, भारत सरकार यांनी विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीकरीता दिनांक ०५.०५.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सुधारीत मार्गदर्शक सूचना जारी केलेल्या आहेत. त्यानुसार राज्यातील विमुक्त जाती व भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग, इतर मागास वर्गातील विद्यार्थ्यांचे भारत सरकार मॅट्रिकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून लाभाचे वितरण केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे असणार आहे.त्यानुषंगाने सदर मार्गदर्शक सूचना राज्यात लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

१. सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, भारत सरकार यांनी विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीकरीता दिनांक ०५.०५.२०२२ रोजीच्या पत्रान्वये जारी केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील मुद्दा क्र. १२.१ नुसार, सन २०२२-२३ पासून भारत सरकार मॅट्रिकपूर्व व

मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्रतिवर्षी अर्थसंकल्पीत करण्यांत येणा-या तरतूदीच्या ६०% केंद्र हिस्सा म्हणून निश्चित करण्यांत आलेला असून राज्य शासनाचा उर्वरीत ४०% बांधील खर्च निश्चित करण्यांत आलेला आहे. सदरचे निधी विभागणीचे सूत्रास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू शासन निर्णय केंद्र शासनाच्या भारत सरकार मॅट्रिकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या दिनांक ०५.०५.२०२२ रोजीच्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या सन २०२१-२२ ते २०२५-२६ साठीच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील निधी वितरणाशी संबंधीत मुद्दा क्र.१२.१ पुरता मर्यादीत असून केंद्र शासनाच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या सन २०२१-२२ ते २०२५-२६ साठीच्या विस्तृत सुधारीत मार्गदर्शक सूचना स्वंतत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. त्याचप्रमाणे सदरहू योजनेकरिता नवीन लेखाशिर्षास मान्यता मिळाल्यानंतर तसेच नवीन सांकेतांक प्राप्त झाल्यानंतर त्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२६१३३२००८५३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDHARTH AMRUTRAO ZALTE

Digitally signed by SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EA004AE581D6FF06989D826800FF7528B6FD6418579108C011AE21079E9E0C9, cn=SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
Date: 2023.06.26 13:33:29 +05'30'

**( सिध्दार्थ झाल्टे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
७. सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण/ सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. उपसचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (शिक्षण-१).